कापूस, सोयाबीन, भात , तूर व हरभरा पिकांवरील किडरोगांच्या व्यवस्थापनासाठी किड सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प (क्रॉपसॅप ) राज्यात सन २०१५-१६ मध्ये राबविण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शासन निर्णय क्रमांकः किरोनि-१६१५/प्र.क्र.१४९/४-अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२

तारीख: १२ जून, २०१५

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः किरानि-१६१४/ प्र.क्र. १४८/४अे, दि.०८ जुलै, २०१४, ९ डिसेंबर, २०१४ व २० फेब्रुवारी, २०१५

२) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५ /प्र.क्र.८५/अर्थ-३ दि. १७ एप्रिल, २०१५

३) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. विप्र-७/क्रॉपसॅप १५-१६/प्र.क्र.२/२६३/१५,दि.३०/५/२०१५

प्रस्तावना

महाराष्ट्र राज्यात गेल्या काही वर्षातील पावसाची अनियमितता, त्यामध्ये पडणारा खंड आणि त्यानुसार हवेत होणारे चढउतार, यामुळे पिकांवरील कीड आणि रोगांच्या वाढीकरिता अचानक निर्माण झालेल्या विशिष्ठ अनुकुल परिस्थितीमुळे मोठ्या प्रमाणात कीड रोगांचा प्रादुर्भाव दिसून आला आहे. मागील काही वर्षांमध्ये प्रामुख्याने सोयाबीन पिकावर पाने खाणाऱ्या अळीचा, विदर्भ आणि मराठवाडा विभागामध्ये प्रादुर्भाव होऊन शेतकऱ्यांचे मोठ्या प्रमाणात नुकसान होत होते. कापूस व सोयाबीन ही नगदी पिके, भात हे तृणधान्यवर्गीय पिक तसेच तूर व हरभरा ही कडधान्यवर्गीय पिके शेतकऱ्यांसाठी आर्थिक दृष्टीने महत्वाची आहेत. सदर पिकांवर उद्भवणाऱ्या किडरोगांच्या प्रादुर्भावामुळे उत्पादनात घट होऊन शेतकऱ्यांचे आर्थिक नुकसान होते. हे नुकसान टाळता यावे, यासाठी कृषी विभागामार्फत " कापूस, सोयाबीन, भात, तूर व हरभरा पिकावरील कीडरोगाच्या व्यवस्थापनासाठी सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प

(क्रॉपसॅप )" आखण्यात आला असून, त्याद्वारे शेतकऱ्यांना कीड रोगाविषयी सर्वेक्षणाच्या आधारे करावयाच्या पिकसंरक्षण उपाययोजना याबाबतचे संदेश देणे, शेतकऱ्यांमध्ये कीडरोगांची ओळख निर्माण करणे, त्यांना प्रशिक्षित करून कीडरोगांचे वेळीच व्यवस्थापन करणे, कीडरोगांच्या प्रादुर्भावाबाबत जागरूकता निर्माण करणे व पुढील संभाव्य नुकसान टाळून उत्पादनात वाढ करणे, इ. उपाययोजना करण्यात येतात.

सदर योजना सन २००९-१० पासून राष्ट्रीय कृषी विकास योजनेमधून राबविण्यात येत होती. ही योजना सन २०१३-१४ पासून राज्य योजना म्हणून राबविण्याचे राज्य शासनाने निश्चित केले आहे. सदर योजनेंतर्गत सन २०१५-१६ या वर्षासाठी ₹१०.०० कोटी निधीची अर्थसंकल्पित तरतूद केली आहे. वित्त्त विभागाने संदर्भाधीन अ.क्र. २ च्या परिपत्रकान्वये योजनांतर्गत योजनांमधील तरतूदीपैकी ७० टक्के निधी वितरित करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर प्रकल्पाअंतर्गत ₹१०००.०० लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता व ₹७००.०० लाख निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

१) राज्यातील ३४ जिल्ह्यांमध्ये कापूस, सोयाबीन, भात व तूर पिकांवरील व २९ जिल्ह्यांमध्ये हरभरा या पिकावरील कीड रोगांच्या व्यवस्थापनासाठी, राष्ट्रीय एकात्मिक कीड व्यवस्थापन केंद्र ( भारतीय कृषी संशोधन परिषद ), नवी दिल्ली, केंद्रीय एकात्मिक कीड व्यवस्थापन केंद्र, नागपूर, महात्मा फुले कृषि विद्यापीठ (MPKV), राहुरी, जिल्हा-अहमदनगर, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, (PDKV), अकोला, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ (BSKKV), दापोली, जिल्हा-रत्नागिरी, मराठवाडा कृषि विद्यापीठ, (MAU) परभणी कृषी विद्यापीठ, कृषी विभाग, सोयाबीन संशोधन संचालनालय, इंदोर, केंद्रीय कापूस संशोधन केंद्र, नागपूर, राष्ट्रीय कोरडवाहू शेती संशोधन संस्था ( CRIDA ), हैद्राबाद, केंद्रिय भात संशोधन संस्था (CRRI), कटक, ओरिसा; भारतीय कडधान्य संशोधन संस्था, (IIPR), कानपूर, उत्तरप्रदेश; राष्ट्रीय वनस्पती आरोग्य व्यवस्थापन संस्था, (NIPHM), हैद्राबाद, आंध्रप्रदेश यांच्या सहभागाने सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये

**"पिकावरील कीडरोग सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प (क्रॉपसॅप)"** राबविण्यासाठी प्रकल्पाअंतर्गत सन २०१५-१६ मध्ये मंजूर असलेल्या ₹१०००.०० लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय व ७० टक्के मर्यादेत ₹७००.०० लाख ( अक्षरी रूपये सात कोटी फक्त ) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२) त्याचप्रमाणे सदर प्रकल्पाअंतर्गत सन २०१४-१५ मध्ये सहभागी संस्थाना वितरित केलेल्या निधीपैकी, सदर संस्थाच्या स्तरावर अखर्चित असलेला ₹२९.६५ लाख निधी, सन २०१५-१६ मध्ये खर्च करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. ज्या सहभागी संस्था कृषी विभागाव्यतिरिक्त आहेत, अशा संस्थांसाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर निधी वितरणाची तरतूद उपलब्ध नसल्याने, त्यांच्यांसाठी तरतूद केलेला निधी कृषी आयुक्तालय स्तरावर आहरित करून, सदर संस्थांच्या बँक खात्यावर आरटीजीएस द्वारे निधी वर्ग करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३) सदर योजनेंतर्गत अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला ₹७००.०० लाख (अक्षरी रूपये सात कोटी फक्त ) निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१५-१६ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष :-**

**मागणी क्र. डी-३,**

**२४०१, पीक संवर्धन,**

**१०२ - अन्नधान्य पिके,**

**( ०० ) ( ३० ) पिकावरील किडरोग सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प**

**( २४०१ ९२४२ ) राज्य योजना**

**३३- अर्थसहाय्य**

४) सदर प्रकल्पाअंतर्गत मंजूर केलेला निधी खर्च करण्यास कृषी आयुक्तालयीन स्तरावर सह संचालक ( लेखा-१), कृषी आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी

म्हणून घोषित करण्यात येत असुन, सदर निधीचे क्षेत्रिय स्तरावर संबंधितांना वितरण करणे, सदर योजना प्रभावीपणे राबविण्यासाठी संबंधित क्षेत्रिय कार्यालयांना मार्गदर्शक सूचना वितरित करणे, यासाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे सदर प्रयोजनार्थ विभागीय कृषी सह संचालक स्तरावर विभागीय कृषी सह संचालक कार्यालयातील लेखाधिकारी, जिल्हा स्तरावर जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, उपविभाग स्तरावर उपविभागीय कृषी अधिकारी व तालुकास्तरावर तालुका कृषी अधिकारी यांना आहरण व वितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

मार्गदर्शक सूचना निर्गमित करताना पुढील बाबींचा प्रामुख्याने समावेश करण्यात यावा :-

**अ )** सदर प्रकल्पाअंतर्गत कंत्राटी कर्मचाऱ्यांचे वेतन, किमान वेतन कायदा, १९४८ अंतर्गत दि. ८/८/२०१४ च्या अधिसुचनेनुसार अदा करावे.

**ब )** नोंदणीकृत मनुष्यबळ सेवा पुरवठा करणाऱ्या संस्थेमार्फत नियुक्त करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यासोबत पत्रव्यवहार करताना, क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी थेट कर्मचाऱ्यांशी पत्रव्यवहार न करता संस्थेमार्फत करावा.

**क)** कामाचा अनुभव किंवा उल्लेखनिय काम केल्याबाबतचे प्रशस्तीपत्रक थेट कर्मचाऱ्यांला देण्यात येऊ नये.

५) सदरहू प्रकल्प, विभागातील सर्व स्तरातील उपलब्ध कृषी अधिकारी व कृषी सहाय्यक यांच्याकडून राबविण्यात यावा. सदरहू कार्यक्रम आपला आहे, अशी जाणीव कृषी आयुक्तालयातील तसेच विभागातील अधिकारी व कर्मचारी यांनी ठेवून, अगदी अत्यावश्यक परिस्थितीतच बाह्य संस्थांमधील कर्मचाऱ्यांची मदत घेण्यात यावी. बाह्य संस्थेतील कर्मचाऱ्यांची मदत घेतली असल्यास, विभागातील अधिकारी व कर्मचारी यांनी आपापसात योग्य तो समन्वय ठेवून योजना प्रभावीपणे राबवावी. सदर प्रकल्पासाठी अत्यावश्यक स्थितीत बाहेरील संस्थाकडून मनुष्यबळ उपलब्ध करून घ्यावे लागल्यास, संबंधित संस्था नोंदणीकृत असणे आवश्यक असून, संबंधित संस्थेशी करावयाच्या कराराबाबत व निविदा प्रक्रियेतील शर्ती व अटीस शासनाची मान्यता देण्यात येत आहे. यापुढे असा

कोणताही कार्यक्रम पूर्णत: बाहेरील कर्मचाऱ्यांकडून राबविण्यास परवानगी मिळणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी. त्याचप्रमाणे सदर आर्थिक वर्षामध्ये प्रत्यक्ष पीक परिस्थितीनुसार प्रकल्पाअंतर्गत सामाविष्ट पिकांच्या पेरणी क्षेत्रात वाढ/घट झाल्यास, प्रत्यक्ष पेरणी क्षेत्रानुसार किड सर्वेक्षक, संगणक प्रचालक, कृषी पर्यवेक्षकाच्या नियुक्तीस व अनुषंगीक खर्चास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

६) सदर प्रकल्प, योजनेसंबंधीच्या शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राबविण्यात यावा. या योजनेकरिता उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्वाक्षरीने शासनास सादर करावे.

७) सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/ अर्थ-३, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये परिशिष्टातील तपासणी सूचीतील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत असून, त्यास मा. अपर मुख्य सचिव (कृषी व पणन ) यांनी ही मान्यता दिलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१२१३०८५०१४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2015.06.12 13:13:04 +05'30'

( सु.सं.धपाटे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (कृषी ), महाराष्ट्र राज्य, पुणे ( ५ प्रती ),

२. कुलगुरू, डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला

३. कुलगुरू,मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी

४. कुलगुरू, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहूरी, अहमदनगर

५. कुलगुरू, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली

६. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य

७. महालेखापाल ( लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र १/२, मुबई / नागपूर

८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचलनालय, मुंबई

९. संचालक ( विस्तार व प्रशिक्षण ), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

१०.संचालक, राष्ट्रीय एकात्मिक कीड व्यवस्थापन केंद्र ( भारतीय कृषी संशोधन परिषद ), नवी दिल्ली

११.संचालक, केंद्रीय एकात्मिक कीड व्यवस्थापन केंद्र, नागपूर,

१२.संचालक, सोयाबीन संशोधन संचालनालय, इंदोर,

१३.संचालक,केंद्रीय कापूस संशोधन केंद्र , नागपूर,

१४.संचालक, राष्ट्रीय कोरडवाहू शेती संशोधन संस्था ( CRIDA ), हैद्राबाद

१५.सर्व संचालक /सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

१६.विभागीय आयुक्त ( सर्व )

१७.विभागीय कृषी सहसंचालक ( सर्व )

१८. जिल्हाधिकारी ( मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून सर्व )

१९.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

२०.जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)

२१.वित्त विभाग, ( व्यय-१ / अर्थसंकल्प-१३ ), मंत्रालय, मंबई-३२

२२.सर्व सहसचिव /उपसचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, कृषी विभाग ( कृषी )

२३.मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

२४.मा. मंत्री यांचे खाजगी सचिव

२५.निवड नस्ती ( कार्यासन ४ अे )